**न्यायालयीन प्रकरणांमध्ये गृह विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालये यांनी शासकीय अभियोक्ता मा.उच्च न्यायालय मुंबई आणि खंडपीठे यांच्याशी समन्वय साधणे व जबाबदार अधिकारी यांनी सुनावणीस उपस्थित राहणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- डीपीपी-०६२३/प्र.क्र.११९/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मुख्य इमारत,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ जून, २०२३.

**वाचा** :-१) विधी व न्याय विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण -२०२३/८२/का १९, दि.०३.०३.२०२३.

**शासन परिपत्रक :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई आणि खंडपीठे येथे दाखल फौजदारी प्रकरणांमध्ये संबधीत क्षेत्रीय अधिकारी व शासकीय अभियोक्ता यांच्यातील समन्वयाच्या अभावामुळे प्रत्यक्ष सुनावणी दिवशी सुनावणीस माहितगार अधिकारी / कर्मचारी उपस्थित न राहिल्यामुळे शासनाची

सुनावणी तहकूब केली जाते तसेच काही प्रकरणात अधिकाऱ्यांवर शास्ती लावण्यात येते. सदर वस्तुस्थिती विचारात घेता, मा. न्यायालयात उपस्थित राहून शासनाची बाजू सक्षमपणे मांडण्यासाठी तसेच शासकीय अभियोक्ता यांच्याशी योग्य तो समन्वय ठेवण्यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१. न्यायालयीन प्रकरणांबाबत शासकीय अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी समन्वय साधण्याकरीता गृह विभाग मंत्रालय स्तरावर उपसचिव/ सहसचिव (विधी) यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे पोलीस क्षेत्रीय कार्यालयांकरिता सर्व पोलीस घटक प्रमुखांनी त्यांच्या अखत्यारीत कार्यालयांत न्यायालयीन कामकाजाकरीता समन्वय अधिकाऱ्याची नेमणूक करावी.

२. सदर समन्वय अधिकाऱ्यांनी मा.उच्च न्यायालय आणि खंडपीठातील शासकीय अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी प्रभावीपणे समन्वय साधून त्यांचेकडून प्राप्त सूचनानुसार विहीत मुदतीत प्रतिसाद देण्यात यावा.

३. शासकीय अभियोक्ता मा. उच्च न्यायालय, मुंबई व खंडपीठे यांच्या कार्यालयामध्ये नियुक्त पोलीस कर्मचारी मार्फत न्यायालयीन सुनावणी दिनांकाबाबत ८-१० दिवस पुर्वी तसेच आदल्या

दिवशी ई मेल व्दारे व व्हाटसॲप व्दारे प्रकरणाशी संबधीत अधिकारी यांना अवगत करण्यात येते, तरी देखील संबधीत माहितीगार अधिकारी सुनावणीसाठी उपस्थित राहत नसल्याचे निदर्शनास आले आहे. तसेच काही प्रकरणी संबधीत अधिकारी सुनावणीसाठी प्रकरणाची माहिती नसलेला प्रतिनिधी पाठवत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यानुषंगाने सूचीत करण्यात येते की, सर्व संबधीत अधिकारी यांनी न्यायालयीन प्रकरणाबाबत मा. उच्च न्यायालयात नियुक्त पोलीस कर्मचाऱ्याकडून सुनावणी दिनांकाबाबत प्राप्त झालेल्या सूचनांची प्राधान्याने दखल घेऊन सुनवणी दिनांकास उपस्थित राहण्याची दक्षता घ्यावी तसेच काही अपरिहार्य कारणास्तव उपस्थित राहणे शक्य नसल्यास माहितगार प्रतिनिधीस परिपुर्ण माहितीसह पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. पोलीस घटकांतर्गत नेमण्यात आलेल्या समन्वय अधिकारी यांनी न्यायालयीन प्रकरणांची योग्य ती नोंद ठेवावी व त्यानुषंगाने मा. उच्च न्यायालयातील न्यायालयीन सुनावणीकरिता माहितगार अधिकारी उपस्थित राहील यांचे नियंत्रण घटक प्रमुखाने करावे तसेच संबधीत अधिकाऱ्याने जाणीवपुर्वक दुर्लक्ष केल्याचे अथवा वेळेवर परिपुर्ण माहिती सादर न केल्याचे आढळून आल्यास संबधीतांविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

५. मा. उच्च न्यायालयाच्या अधिकृत संकेतस्थळावर वेळोवेळी न्यायालयीन प्रकरणांची सद्यस्थिती उपलब्ध असते. त्यानुषंगाने पोलीस घटकांतर्गत नियुक्त समन्वय अधिकारी तसेच संबधीत अधिकारी यांनी याबाबत वेळोवेळी नोंद ठेवून आवश्यक कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन परिपत्रक हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०६२३१९५७२८९२२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDEEP BHIVRAJ PAWAR

Digitally signed by SANDEEP BHIVRAJ PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=ff342077573d6da5d5f85c3d90fda86e6ede5234a80cc83053f54097b9680600, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0B2AF4F18680EBFC370E00D1233E3FBC06707953799167BB51529B858E2004E0, cn=SANDEEP BHIVRAJ PAWAR
Date: 2023.06.23 19:58:34 +05'30'

**( संदीप भि. पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
३. महाधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
६.सर्व पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक

७. सरकारी अभियोक्ता उच्च न्यायालय मुंबई.

८.सरकारी वकील, उच्च न्यायालय (मूळ शाखा)/(अपील शाखा) आणि (रिट सेल)(अपील शाखा) मुंबई

९.सरकारी वकील उच्च न्यायालय मुंबई / खंडपीठ नागपूर आणि औरंगाबाद

१०. निवडनस्ती (पोल-१०).